केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, कडधान्य, व मका विकास कार्यक्रम (Integrated Scheme of Oilseed, Pulses, Oilpalm and Maize - ISOPOM) सन २००९ -१० मध्ये राबविण्यास प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्याबाबत

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : आयएसओपी-१६०९/सीआर-३३/४-अे,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २७ ऑक्टोबर, २००९

संदर्भः -

१) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २४ जुलै, २००९
२) केंद्र शासन कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक २-१०/ २००९-pul/ TMOP, दिनांक २४ जून ,२००९ व दि. २९ सप्टेंबर,२००९
३) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. कृआ/ विप्र-३/ आयसोपॉम/ अमा/ प्र.क्र.१४/ ४७१/०९, दिनांक १५ ऑक्टोबर,२००९

प्रस्तावना :-

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय गळीत धान्य उत्पादन कार्यक्रम, राष्ट्रीय कडधान्य विकास कार्यक्रम व गतीमान मका विकास कार्यक्रम राज्यात सन १९९५-९६ पासून राबविण्यात येत आहेत. सन २००४-०५ पासून हे सर्व कार्यक्रम एकत्रित करुन केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य कडधान्य, तेलपाम व मका विकास कार्यक्रम (Integrated scheme of Oilseed, Pulses, Oilpalm and Maize-ISOPOM) ही योजना, तेलपाम घटक वगळता अन्य घटकांसाठी राज्यात राबविण्यात येत आहे. या योजनेच्या निधीत केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ७५:२५ असे आहे.

केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधीन दिनांक २४ जून, २००९ च्या पत्रान्वये सन २००९-१० मध्ये केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, कडधान्य, तेलपाम व मका विकास कार्यक्रम (Integrated Scheme of Oilseed, Pulses, Oilpalm and Maize-ISOPOM) राबविण्यास रु. ३८६६.६६ ( रु. अडोतीस कोटी सहासष्ट लाख सहासष्ट हजार फक्त) लाखाच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. सदर योजना सन २००९-१० मध्ये राबविण्यास केंद्र शासनाने प्रथम हप्त्यापोटी मंजूर केल्यानुसार रु. ६४३.४८ लाखाच्या कार्यक्रमास संदर्भाधीन दिनांक २४ जुलै, २००९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

सदर योजनेकरिता केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाकिंत दिनांक २९ सप्टेंबर २००९ च्या पत्रान्वये केंद्र हिश्श्याचे (दुसरा हप्ता ) रु. १४१३.३७६ लाख (अक्षरी रु. चौदा कोटी तेरा लाख सदोतीस हजार सहाशे फक्त) मुक्त केले आहेत. (सदर रकमेमध्ये रु. २१०.१२६ लाख

(अक्षरी रु. दोन कोटी दहा लाख बारा हजार सहाशे फक्त) या रकमेचा गुणवत्ता पूर्ण बियाणे वाटप अनुदान म्हणून अंतर्भाव आहे. ) केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार हा कार्यक्रम राज्यात सन २००९-१० मध्ये राबविण्यासाठी प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २००९-१० या वर्षासाठी केंद्र शासनाने त्यांचे संदर्भाधीन पत्र दिनांक २४ जून, २००९ अन्वये केंद्र पुरस्कृत "आयसोपाम" योजनेअंतर्गत एकात्मिक गळीत धान्य, कडधान्य व मका विकास कार्यक्रम राबविण्यास रु.३८६६.६६ लाख (अक्षरी रु. अडोतीस कोटी सहासष्ट लाख सहासष्ट हजार फक्त) इतक्या निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. तसेच केंद्र शासनाच्या ७५ टक्के हिश्श्यामधील रु. १४१३.३७६ लाख निधी दुसरा हप्ता म्हणून मुक्त केला आहे. (सदर रकमेमध्ये रु. २१०.१२६ लाख (अक्षरी रु. दोन कोटी दहा लाख बारा हजार सहाशे फक्त) या रकमेचा गुणवत्ता पूर्ण बियाणे वाटप अनुदान म्हणून अंतर्भाव आहे. ) केंद्र शासनाची ही मान्यता लक्षात घेवून केंद्र पुरस्कृत " आयसोपाम" योजनेंतर्गत एकात्मिक गळीत धान्य, कडधान्य व मका विकास कार्यक्रम सन २००९-१० मध्ये राबविण्याकरीता रु. १४१३.३७६ लाख (अक्षरी रु. चौदा कोटी तेरा लाख सदोतीस हजार सहाशे फक्त) इतक्या निधीच्या केंद्र हिश्श्याच्या कार्यक्रमास शासनाची प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात येत आहे. या मंजूर निधीचे योजनानिहाय वितरण पूढीलप्रमाणे राहील.

(रुपये लाखात)

| योजनेचे नांव | केंद्र हिस्सा |
|---|---|
| गळीत धान्य उत्पादन कार्यक्रम | ११७२.८२० |
| कडधान्य विकास कार्यक्रम | १८१.७६१ |
| मका विकास कार्यक्रम | ५८.७९५ |
| एकूण | १४१३.३७६ |

२. या योजनेसाठी मंजूर केलेला रु. १४१३.३७६ लाख निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २००९-१० च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३ (रु. लाखात )

अ) २४०१, पीक संवर्धन ११४, तेलबियाणे विकास --- ७४१.६१३
केंद्र पुरस्क़ृत योजना (केंद्र हिस्सा ७५ टक्के) (००) (०६)
एकात्मिक तेलबिया उत्पादन कार्यक्रम (२४०१ २४९८) ३३ अर्थसहाय्य

ब) २४०१, पीक संवर्धन ११४, तेलबियाणे विकास --- ४३१.२०७
महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समित्या अधिनियम १९६१ च्या
कलम १२३ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (स्थानिक क्षेत्रातील योजना )
(अर्थोपाय अग्रिमाशी समायोज्य) जिल्हास्तर (केंद्र हिस्सा) (००) (१०)
तेलबिया विकास कार्यक्रम (२४०१ ४६६१) ३१ सहायक अनुदान, ३३ अर्थसहाय

क) २४०१,पीक संवर्धन ११२, कडधान्य विकास --- ९२.९४१
केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ७५ टक्के) (००) (०२)
एकात्मिक कडधान्य उत्पादन कार्यक्रम (२४०१ १७६९) ३३ अर्थसहाय्य

ड) २४०१, पीक संवर्धन ११२, कडधान्य विकास --- ८८.८२०
महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समित्या अधिनियम १९६१ च्या
कलम १२३ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (स्थानिक क्षेत्रातील योजना)
(अर्थोपाय अग्रिमाशी समायोज्य) जिल्हास्तर (केंद्र हिस्सा) (००) (०७)
कडधान्य उत्पादन कार्यक्रम (२४०१ ४६३२) ३१ सहायक अनुदान, ३३ अर्थसहाय

इ) २४०१, पीक संवर्धन १०२, अन्नधान्य पीके (००) (१६) --- ५६.७५५
एकात्मिक मका विकास कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना(२४०१ ३५८३)
(केंद्र हिस्सा ७५ टक्के) ३३ अर्थसहाय

फ) २४०१, पीक संवर्धन १०२, अन्नधान्य पीके --- २.०४०
महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समित्या अधिनियम १९६१ च्या
कलम १२३ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (स्थानिक क्षेत्रातील योजना)
(अर्थोपाय अग्रिमाशी समायोज्य) जिल्हास्तर (केंद्र हिस्सा) (००) (२४)
एकात्मिक मका उत्पादन कार्यक्रम (२४०१ ४५६१) ३१ सहायक अनुदान, ३३ अर्थसहाय

३. केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. २४ जून, २००९ च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मार्गयदर्शक सूचनानुसार सन २००९-१० मध्ये एकात्मिक गळीत धान्य, कडधान्य व मका विकास कार्यक्रम राबविण्यात यावा. तसेच या योजनेकरीता केंद्रिय कृषि मंत्रालयाने त्यांच्या पत्र क्रमांक १४-३/०४(CA-II(KB) दिनांक २३ डिसेंबर, २००४ व दि. २४ जून, २००९ अन्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे कार्यक्रमांची अंमलबजावणी होईल याची दक्षता घेण्यात यावी.

४. राज्य हिश्श्याच्या जिल्हा नियोजन व विकास समितीच्या अख्यत्यारितील तरतूदीस प्रशासकीय तसेच वित्तिय मान्यता संबंधित जिल्हयाधिकारी यांचेकडून देण्यात येतील.

५. या कार्यक्रमाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून उद्दिष्टनिहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भुत करण्याची दक्षता घेण्यात यावी.

i) लाभार्थी निवडताना लहान व सिमांतिक शेतकरी, अनूसुचित जाती / जमाती व महिला लाभार्थी यांना प्राधान्य देण्यात यावे.

ii) मंजूर निधीपैकी १६ टक्के निधी अनुसूचित जाती व ८ टक्के निधी अनुसूचित जमातीसाठी व ३० टक्के निधी महिला लाभार्थ्यांसाठी खर्च करण्यात यावा. याबाबतच्या नोंदी स्वतंत्रपणे ठेवण्यात याव्यात.

iii) योजनेची अंमलबजावणी अधिक प्रभावी व परिणामकारकरित्या होण्याच्या दृष्टीने या योजनेंतर्गत प्रकल्पाधारीत विकास / विस्तार कार्यक्रम (Projectised Development/ Extension Approach) राबविण्यात यावा.

iv) प्रत्येक जिल्हयाचा विस्तार व फलोत्पादन आराखडा तयार करण्यात येत आहे. त्यामध्ये या योजनेचा अंतर्भाव गरजेनुरुप ठेवण्यात यावा.

v) या योजनेचे मुल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून (Third Party Evaluation) करुन घ्यावे.

vi) वैयक्तिक लाभार्थी निवडताना महिला लाभार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे. असे लाभार्थी उपलब्ध नसल्यास, इतर लाभार्थींची निवड करण्यात यावी.

vii) सन २००८-०९ मध्ये लाभ घेतलेल्या व २००९-१० मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये / पंचायत समिती / जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी तसेच ती यादी विभागाच्या वेबसाईटवर देखील देण्यात यावी.

६. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय प्रधान सचिव (कृषि ) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक ( 200910271409360001 ) असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. मा. बिवलकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

प्रति,

आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी, (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.

**सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई**

**महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर**

**नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२**

**वित्त विभाग (व्यय) अर्थसंकल्प -१३**

**सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२**

**ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई**

**सर्व सह सचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन प्रभाग)**

**मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव**

**मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव/ निवडनस्ती**